# महाराष्ट्र शासन

<u>तात्काळ</u>

क्र. प्रतिनि २५१८/प्र.क्र. १०४/१४-अ,
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.
दूरध्वनी क्र.२२७९४१७२/२२७९३३४४
दिनांक : ०४ जुलै, २०१८

**प्रति,**

सह/उप सचिव (आस्थापना),
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**विषय:-** भाडे नियंत्रण कार्यालय, कोकण विभाग, कार्यालयात लिपिक-टंकलेखकाचे रिक्त पदे प्रतिनियुक्ती भरण्याबाबत.

**संदर्भ:-** १) गृहनिर्माण विभाग नस्ती क्र. भानिका-२०१८/प्र.क्र.५७/गृनिधो-१
२) सा.प्र.वि. शा.नि. क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्या-१४, दिनांक ३१-०८-२०१७.

महोदय/महोदया,

सा.प्र.वि.शा.नि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का.१२, दिनांक १७-१२-२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, संदर्भ क्र.२ येथील दिनांक ३१-८-२०१७ च्या शासन निर्णयान्वये मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. सदरहू कार्यपध्दतीस अनुसरुन गृहनिर्माण विभागाने संदर्भ क्र १ येथील प्रस्तावान्वये गृहनिर्माण विभागाच्या अधिनिस्त सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कार्यालय, कोकण विभाग या कार्यालयातील २ लिपिक-टंकलेखकांचे रिक्त पदे मंत्रालयीन विभागातील लिपिक-टंकलेखक संवर्गातील कर्मचाऱ्यांकडून भरण्याबाबत विनंती केली आहे त्यास खालील तक्त्यातील **स्तंभ क्र.५** येथील कार्यालयातील रिक्त पदे प्रतिनियुक्तीने भरण्याकरीता इच्छुकता मागविण्यात येत आहे :-

| अ.क्र. | प्रतिनियुक्तीने भरावयाचे पदाचे नांव | मंत्रालयीन संवर्ग | प्रतिनियुक्तीने भरावयाचे पदांची संख्या | प्रतिनियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| १ | लिपिक-टंकलेखक | लिपिक-टंकलेखक | २ | सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कार्यालय, कोकण विभाग |

२. उपरोक्त पदावर प्रतिनियुक्तीने जाण्याकरिता इच्छुक मंत्रालयीन विभागातील लिपिक टंकलेखक यांनी आपल्या मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडे अर्ज सादर करावा कोणत्याही परिस्थितीत या विभागाकडे थेट अर्ज करु नयेत. थेट प्राप्त झालेल्या अर्जावर कोणतीही कार्यवाही करण्यात येणार नाही.

३. सर्व संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी इच्छुक कर्मचाऱ्यांचे अर्ज प्राप्त झाल्यानंतर संदर्भाधिन शासन निर्णयातील तरतूदीनुसार अर्जांची छाननी करुन खालील माहितीसह आपल्या विभागाच्या सचिवांच्या मान्यतेने इच्छुक कर्मचाऱ्याचा प्रतिनियुक्तीचा प्रस्ताव खालील माहितीसह या कार्यासनाकडे दिनांक १७-०७-२०१८ पर्यंत पोहोचतील अशारीतीने (नोंदणी शाखेत पाठवू नये) पाठवावा :-

| | | |
|---|---|---|
| १) | कर्मचाऱ्याचे संपूर्ण नांव व पदनाम | |
| २) | जन्मदिनांक | |
| ३) | सेवानिवृत्तीचा दिनांक (पहा शा.नि.दिनांक १७-१२-२०१६ मधील तरतुद ५ (ब) (६) | |
| ४) | शैक्षणिक अर्हता | |
| ५) | भ्रमणध्वनी क्रमांक | |
| ६) | मागील ५ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत) | |
| ७) | मत्ता व दायित्व सादर केली आहेत का? (दि.३१.३.२०१७ रोजीचे) | |
| ८) | ५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास) | |
| ९) | संबंधित कर्मचाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (पद, ठिकाण व कालावधी) | |
| १०) | संबंधित कर्मचाऱ्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु अथवा प्रस्तावित आहे काय? | |

५. एकदा निवड झालेल्या कर्मचाऱ्याला त्याचे नाव मागे घेता येणार नाही. तसेच, आपल्या विभागातून सदर पदावर **प्रतिनियुक्तीसाठी जाण्यास कोणीही कर्मचारी इच्छुक नसल्यास तसेही कृपया दिनांक १७-०७-२०१८ पर्यंत या विभागास कळविण्यात यावे.**

६. सरळसेवा लिपिक-टंकलेखक (मराठी/इंग्रजी) परीक्षा २०१७ मधून मंत्रालयीन विभागात लवकरच लिपिक-टंकलेखक संवर्गातील कर्मचारी उपलब्ध करुन देण्यात येणार आहे याची विभागांनी नोंद घ्यावी.

७. सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवरील संदेशफलक या टॅबखाली प्रसिध्द करण्यात येत आहे.

८. सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८०७०४१७०१३१७५०७ असा आहे. हे पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

आपला,

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2018.07.04 17:02:46 +05'30'

**( इ.मु.काझी )**
**सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग**

**प्रत :-**

१) उप सचिव (कार्यासन -गृनिधो-१), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
२) सा.प्र.वि./१४-अ (संग्रहार्थ).